प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर अंतर्गत मोरेवाडी येथे वाहन तपासणी व परिक्षण केंद्राच्या (I & C Centre) जागेचे सपाटीकरण व आवारभिंत बांधण्यासाठी येणाऱ्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एमव्हीडी-०९२१/प्र.क्र.२६१/परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १५ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमा-२ दि.१६/१२/२०१५.

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९.

३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२ दि.२५/०९/२०१९.

४) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का.१०/ रवका/I &C/ कोल्हापूर/२०२१/जा.क्र.११५९७, दि.१५/०९/२०२१.

५) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/वानिता (१५)/०४१४/ न.क्र.०३/का.१०(१)/जा.क्र.११०८७, दि.१५/०९/२०२१.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर अंतर्गत मोरेवाडी येथे वाहन तपासणी व परिक्षण केंद्र (I & C Centre) उभारण्यासाठी परिवहन विभागाच्या मालकीच्या ५ एकर जागेचे सपाटीकरण व आवारभिंत बांधण्यासाठी येणाऱ्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, कोल्हापूर अंतर्गत मोरेवाडी येथील ब्रेक टेस्ट ट्रॅकसाठी असणा-या जागेत भराव टाकणेच्या कामी तसेच प्रस्तावित वाहन निरिक्षण व प्रशिक्षण केंद्र (I & C सेंटर) च्या जागेचे सपाटीकरण व आवारभिंत बांधणेकरीता आवश्यक रु.८४,१४,३२३/- (अक्षरी रुपये चौऱ्यांशी लक्ष चौदा हजार तीनशे तेवीस फक्त) खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कामाच्या खर्चाचा तपशिल (Recapitulation Sheet) खालीलप्रमाणे :-

| Sr. No. | Sub-Estimate No. & Name | Amount |
|---|---|---|
| 1 | a) Work Portion | Rs.28,31,895.00 |
| | b) U.C.R. Compound Wall | Rs.35,54,602.00 |
| | **(a+b)** | **Rs.63,86,497.00** |
| 2 | Royalty Charges | Rs.9,15,484.00 |
| 3 | Lab Testing Charges | Rs.58,570.00 |
| 4 | Add work contingency on Rs.63,86,497.00 (4.00%) | Rs.2,55,460.00 |
| 5 | Add Insurance towards Labour (0.50%) On Rs.63,86,497.00 | Rs.31,932.00 |
| 6 | Add G.S.T. on Roads & Brides On Rs.63,86,497.00 (12%) | Rs.7,66,380.00 |
| | **Total** | **Rs.84,14,323.00** |

३. सदर कामाची ई-निविदा करतांना कामाचे तुकडे न करता एकत्रित निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

४. सदरहू प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने आवश्यक निधीची तरतूद स्वतंत्रपणे करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर यांनी दिलेल्या तांत्रिक सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारामधील परिच्छेद क्र.१३४ (१), १३४ (२), आणि १३४ (३) मधील वित्तीय अधिकारांच्या वित्तीय मर्यादा व अटीमध्ये सुधारणा करण्याबाबतचा वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक २०.०९.२०१९ मधील अ.क्र.१, परिच्छेद क्र. १३४ (१) अन्वये इमारतीच्या बांधकामाच्या नकाशास व अंदाजित खर्चास (वित्तीय मान्यता धरुन) प्रशासकीय मान्यता देणेबाबत प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१५१५२८०७६३२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2022.02.15 15:30:10 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, १/२, मुंबई / नागपूर.
५. अपर मुख्य सचिव, गृह (परिवहन) विभाग, मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

६. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. उप सचिव (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.कक्ष अधिकारी (बीयुडी- १), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती (परि-४).